नवीन पोलीस प्रशिक्षण केंद्रे सुरु
करण्यास मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक : टीईएक्स-०३०८/प्र.क्र.१६०/पोल ५अ,
मंत्रालय, मुंबई ३२, दिनांक : १९ एप्रिल, २०१०.

वाचा:- गृह विभाग, शासन निर्णय क्र.टिईएक्स-०३०३/सीआर-२१७/पोल-५अ, दि.२६.१०.१९९५.

शासन निर्णय :- राज्याच्या पोलीस दलातील पोलीस शिपाई हा संवर्ग मूलभूत संवर्ग आहे. पोलीस शिपाई या पदावर नियुक्ती दिलेल्या उमेदवारांना निवड झाल्यानंतर नऊ महिन्यांचे मूलभूत प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी राज्यात विविध ठिकाणी पोलीस प्रशिक्षण केंद्रे कार्यरत आहेत. त्यासाठी शासनाने पोलीस प्रशिक्षण केंद्र, तासगाव (जि. सांगली) व पोलीस प्रशिक्षण केंद्र, धुळे या ठिकाणी नवीन पोलीस प्रशिक्षण केंद्रे सुरु केलेली आहेत. या दोन्हीही ठिकाणच्या केंद्रांसाठी इमारतींचे बांधकाम व पदांची निर्मिती झालेली आहे. या प्रशिक्षण केंद्रात नजिकच्या काळात प्रत्यक्ष प्रशिक्षण सुरु होईल. अशाप्रकारे राज्यात इतरत्रही पोलीस प्रशिक्षण केंद्रे सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यापूर्वी संदर्भ क्र.१ नुसार मान्यता देण्यात आलेल्या पोलीस प्रशिक्षण केंद्र, वरणगाव (जि.जळगाव) तसेच पांढरकवडा (जि. यवतमाळ) व नांदेड आणि कोकण विभागात प्रत्येकी एक पोलीस प्रशिक्षण केंद्रे सुरुकरण्यास तत्वतः मान्यता देण्याचा शासनाने दिनांक १७ फेब्रुवारी, २०१० रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत निर्णय घेतला आहे.

२. यासाठी आवश्यक खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचे आराखडे व नकाशे आणि पदनिर्मिती यासाठी स्वयंस्पष्ट प्रस्ताव शासनाच्या मंजूरीसाठी सादर करण्याबाबत पोलीस महासंचालक यांना आदेश देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सदानंद जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्रे,
सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक,
सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे,
कार्यासन-बीयुडी १, पोल-४, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती.